# वसाहतवाद

नेमाडे यांच्या जातिव्यवस्थेविषयक विचाराचा परामर्ष घेतल्यानंतर त्यांच्या देशव्यवस्थेविषयक विचारांचा इथे विचार करावयाचा आहे. हा विचार वसाहत विरोधापासून सुरू होतो, म्हणून प्रथम त्याचा विचार करू.

नेमाडे यांनी 'टीकास्वयंवर' मध्ये कुठेच वसाहतवाद म्हणजे काय ते स्पष्ट केलेले नाही. त्यामुळे वसाहवादाचा प्रथम आपण थोडक्यात विचार करू.

मागेच म्हटल्याप्रमाणे युरोपियनांच्या वैश्य जाणिवांनी (इंग्रजांची वैश्य जाणीव ही सर्वात प्रगल्भ होती) हळूहळू जग व्यापायला सुरुवात केली. सुरुवातीला केवळ व्यापार करण्याच्या इच्छेने हे वैश्य बाहेर पडले होते. ह्यांच्या कार्याचे टप्पे पुढीलप्रमाणे सांगता येतील :

१) प्रथम व्यापारासाठी चांगली असणारी भूमी शोधणे.

२) ह्या भूमीशी व्यापारी पातळीवर संबंध निर्माण करणे. जर भूमी अधिकच मागासलेली असेल तर सरळ ताब्यात घेणे.

३) तेथील शासनाकडून व्यापार करण्याचे हक्क पदरात पाडून घेणे.

४) तेथे व्यापारासाठी आवश्यक असलेला कच्चा माल कोणत्या स्वरूपात अस्तित्वात आहे याचा अंदाज घेत घेत आपला पक्का माल खपविणे.

५) कच्च्या मालाच्या प्राप्तीसाठी व पक्क्या मालाच्या बिनघोर विक्रीसाठी ती भूमी आपल्या ताब्यात घेणे. त्या भूमीतील खनिजे वा कच्च्या पिकासाठी भूमी ताब्यात ठेवणे. त्या भूमीवर शासनव्यवस्था निर्माण करणे.

६) स्थानिक लोकांना आपल्या कामासाठी मजूर म्हणून वापरणे. त्यांची खरेदी-विक्री, आयात-निर्यात करणे.

७) समांतर शासनव्यवस्था राबविता यावी म्हणून स्थानिक लोकांनाच शिक्षण देऊन सुशिक्षित मजूर तयार करणे. हे करताना आपले अत्याधुनिक तंत्र मात्र त्यांना न शिकविता केवळ पुस्तकी विद्या शिकविणे.

८) संपूर्ण वसाहतीतील लोकांना आपल्या मालाचे ग्राहक बनविणे. त्यासाठी स्थानिक वैश्यांची मदत घेणे किंवा आवश्यकता असेल तर दडपणे. वसाहतींना आपली बाजारपेठ बनविणे.

सर्वच युरेपियन लोकांनी ह्या वसाहतवादाच्या जोरावर अफाट आर्थिक शोषण केले. वसाहतीतल्या लोकांचीच नैसर्गिक संपत्ती वापरून स्वतःजवळ असलेल्या आधुनिक तंत्राच्या बळावर लोकांनाच मजूर बनवून तयार केलेला पक्का माल वसाहतीतील लोकांनाच खपविण्याचा हा मार्ग होता. वसाहतीतील लोकांची मजुरीही तेच पक्क्या मालाचे ग्राहक असल्याने आपोआपच पुन्हा युरोपियन वैश्यांकडे येत होती; म्हणजेच इथली नैसर्गिक साधनसंपत्ती आणि मजूर हे दोन्ही घटक ह्या वर्गाला फुकटात वापरायला मिळत होते. शासनसंस्था व संरक्षण व्यवस्थेसाठी आवश्यक असलेले कारकून व सैनिकही स्थानिक लोकांतून उपलब्ध होत होते. काही वेळा तर ही स्थानिक शासनव्यवस्था पुरेशी सशक्त होताच तिथल्या युरोपियन वैश्यांनी खुद्द आपल्याच देशातील शासनव्यवस्थेशी विद्रोह केला आणि स्वतंत्र राष्ट्रे निर्माण केली.उदा. अमेरिका.

ह्या पार्श्वभूमीवर आपण नेमाडेंच्या विवेचनाकडे वळू.

नेमाडे यांनी 'आंग्ल मराठी संपर्क' ह्या निबंधात इंग्लंड आणि भारत या दोन देशांतील संस्कृतीचा संपर्क आल्यामुळे मराठीवर नेमके काय परिणाम झाले ह्याचे तपशीलवार विवेचन केले आहे. इंग्रजीतील भारतीयांचे लेखन ह्या विषयावरही 'भारतीयांचे इंग्रजी लेखन' 'अरुण कोल्टकर : द्विभाषिक कवित्व' असे दोन महत्वाचे लेख लिहिले आहेत.' इंग्रजीचा मराठीवरील प्रभाव' व 'वाङ्मयीन प्रभावाच्या अभ्यासाचा सैद्धांतिक आराखडा आंग्ल भारतीय संदर्भात' ह्या दोन निबंधातील नेमाडे यांचे विवेचन जवळजवळ सर्वांनाच मान्य होईल असे आहे. फक्त नेमाडेंनी सुचवलेला सैद्धांतिक आराखडा कोणत्याही अर्थाने देशी नाही एवढे इथे जाता जाता सुचवावेसे वाटते. 'इंग्रजीचा मराठीवरील प्रभाव' तपासतानाही त्यांनी वापरलेली अभ्यासाची तऱ्हा ही पाश्चात्त्य भाषाशास्त्र व शैलीशास्त्रातून जन्मलेली आहे हे इथे सुचवावेसे वाटते. मी ह्या दोन्हीत तज्ज्ञ नसल्याने यावर काही विवेचन करणे अप्रस्तुत ठरेल.

नेमाडे यांचे हे सर्व विवेचन नीट पाहिले तर त्यात खालील मुद्दे केंद्रस्थानी आढळतात.

१) आंग्ल-मराठी संपर्क हा जेते-जीत संपर्क होता व जेत्यांनी इंग्रजी शिक्षण सुरू करून इंग्रजी भाषेतून आपली इंग्रजी मूल्ये लादली.

२) भारतीयांचा वाङ्मयीन परीघ हा बृहत व बहुस्तरीय आहे, तर इंग्रजांचा तो लहान आहे आणि अल्पस्तरीय आहे; त्यामुळे इंग्रजी वाङ्मयीन मूल्ये इथल्या वाङ्मयाला लावणे शक्य होणार नाही.

३) भारतीयांनी इंग्रजीला पर्याय म्हणून जो संस्कृत प्रभाव स्वीकारला त्याने भाषेतील

चैतन्य कमी झाले व ती लय बिघडवून बसली.

४) समाजाच्या विरोधात व्यक्ती ही मुळातच पाश्चिमात्य संकल्पना आहे व त्यात व्यक्तित्व हे कमाल मर्यादेपर्यंत ताणले जाते. व्यक्ती व समाजातील ह्या तणावात्मक नात्यास हिंदूंचे नीतिशास्त्र, हिंदूंची सामाजिक रचना मान्यता देत नसल्यामुळेच १८१८ नंतरच्या साहित्यातून अभिव्यक्त झालेला हा व्यक्ती व समाज यांच्यातील संघर्ष अस्वस्थता निर्माण करण्याऐवजी मनोरंजनच अधिक करतो.

नेमाडे यांच्या वरील सर्व मुद्द्यांचा तसेच त्यांच्या देशीयतेच्या संकल्पनेचा विचार करण्यासाठी प्रथम आपणाला वसाहतवाद हा खरोखरच वाईट होता का ? या अत्यंत मूलभूत मुद्द्याचा विचार केला पाहिजे. कारण वसाहतवाद वाईट होता हे सिद्ध झाले तर, ज्या आंतरराष्ट्रीय संरचनेला नेमाडे विरोध करीत आहेत आणि त्याला पर्याय म्हणून देशी संस्कृतीचा अंगीकार सुचवत आहेत, त्या विरोधाला व देशी संस्कृतीच्या अंगीकाराला आपणाला स्वीकारावे लागेल. वसाहतवादाचा विचार आपण अनेकदा केवळ क्षत्रिय जाणिवेतून करतो त्यामुळे केवळ तोटेच तोटे दिसतात. वसाहतवादाने एतद्देशीयांना ब्राह्मण जाणिवेतून मुक्त केले हे मात्र सोयीस्कररित्या विसरतो. त्याचबरोबर त्यांनीच वैश्य जाणीव एतद्देशीयांपर्यंत पोहोचविली हेही विसरतो. त्यांनीच पूर्व क्षत्रिय जाणिवेतून आपणाला मुक्त करून उत्तर क्षत्रिय जाणिवेपर्यंत पोहोचविले हेही आपण विसरतो. वस्तुस्थिती अशी आहे की, हिंदू आणि मुस्लिम समाज हे सध्याच्या काळातले इतके निर्लज्ज समाज आहेत की त्यांना दोन शतके युरोपियनांनी प्राप्त केलेल्या ज्ञानाच्या जोरावर आपण केवळ ऐतखाऊपणाने जगतो आहोत याची साधी लाज नाही. आपल्या घरातील वीज युरोपियनांची, आपले कपडे युरोपियन, आपले कागद, आपले पेन सर्व सर्व गोष्टी की ज्या मिळविण्यासाठी युरोपियन लोकांनी, संशोधकांनी रात्र रात्र जागविल्या, तिथल्या व्यक्तींनी समाजाविरुद्ध लढे दिले, आयुष्य कुर्बान केले ते आपल्याला इतक्या ऐतखाऊपणाने मिळाले आहे की जणू काय आपण ह्या साऱ्या गोष्टी आपल्या बापजाद्यांच्या मालकीच्या होत्या अशा थाटात सध्या जगत आहोत. केवळ तथाकथित भाषेच्या पातळीवर विचार करून इंग्रजांना शिव्या देऊन हा मुद्दा संपणार नाही. आपल्या भाषेतील पेन, आपल्या भाषेतील बिल्डिंग ही केवळ तशीच आली आहे; पण युरोपमध्ये त्या लोकांनी त्या पेनासाठी प्रचंड संघर्ष केलाय. काही लोकांनी त्यासाठी आयुष्य दिलंय.

माझा अनुभव असा आहे की, एकंदर भारतीयांना वैज्ञानिक ज्ञानाविषयी पुरेसा आदर नाही किंवा वैज्ञानिक ज्ञान निर्माण करण्याची तळमळ नाही. त्यामुळेच गॅट आणि डंकेलला आज

विरोध होतो आहे. जणू युरोपियन लोकांना तुम्ही लॅबमध्ये दिवसरात्र राबून संशोधन करा आणि तुमचे संशोधन आम्हाला फुकटात द्या, आम्ही ऐतखाऊपणे बसून ते वापरू ही वृत्तीच यातून दिसते.

युरोपियन लोकांना शह द्यायचा असेल तर पेटंट कायद्याला विरोध करून उपयोग नाही, तर आपणच अशी काही नवी संशोधने करून त्याची पेटंट्स मिळवायला हवीत. उदाहरणार्थ, एड्सला प्रतिबंधक लस व औषध-योजना तयार केलीत व त्या संशोधनाने पेटंट्स मिळवले तर जगभर राज्य करायला तुम्ही मोकळे आहात. पण प्रश्नांना समोर भिडणे आम्हाला माहित नाही. त्यापासून आपण कायम गांडूसारखे पाय लावून पळ काढणार. त्यामुळे (नामदेव ढसाळांच्या काव्यसंग्रहाचे गांडू बगीचा हे नाव ह्या अर्थानेही सार्थ आहे.) हा देश आज एक 'गांडू बगीचा' बनलाय. तो जोपर्यंत धाडसी जंगल बनत नाही तोपर्यंत त्याला भविष्य नाही. नेमाडेंचा देशीवाद हा असाच एक गांडूपणा आहे. भारतातील एक वर्ग इथल्या समस्यांपासून पळ काढून परदेशात जाण्याचा गांडूपणा दाखवतो, तर दुसरा इथल्या भूतकाळात किंवा आदिवासी आणि वारकऱ्यांच्यात देशीवादाच्या नावाखाली तोंड लपवितो. हे दोन्हीही गांडूपणाचे प्रकार ह्या देशाला घातक आहेत. म्हणून मी त्यांना विरोध करण्यासाठी हा लेख लिहितो आहे. हे सर्व सांगण्याचे कारण असे की, एका नव्या प्रकारची वैद जाणीव, जी २१ व्या शतकात चिन्ह संस्कृतिकडे आपोआपच वाटचाल करणार आहे, आपल्या दाराशी येऊन ठेपली आहे आणि आपण पुन्हा एकदा देशीवादाच्या नावाखाली वसाहतवाद - वसाहतवाद म्हणून आरडाओरडा करीत आहोत. तेव्हा ह्या नव्या पार्श्वभूमीवर पुन्हा वसाहतवाद नीट समजून घेणे गरजेचे वाटते.

वसाहतवादाचा विचार करताना तो कोणत्या टप्प्याटप्प्याने काम करतो ते आपण पाहिले. ह्या वसाहतवादामुळे भारतीयांना नेमका फायदा काय झाला हे आपण जरा पाहू.

१) वसाहतवादामुळेच वैश्य जाणीव भारतात आली. ह्यापूर्वी भारतात आलेली वैश्य जाणीव ही प्रामुख्याने वाणी जाणीव होती. हा वाणी तंत्रज्ञानाचा उत्पादक नव्हता. ह्यामुळेच अत्याधुनिक वैश्य जाणीव वसाहतवादाने आणली असे म्हणणे भाग आहे.

२) नवीन यंत्रे आली, छपाईचे मशीन आले, कारखाने आले.

३) धार्मिक ज्ञानाची जागा तंत्रज्ञान घेऊ लागले. ब्राह्मणांची ज्ञानावरील मक्तेदारी संपुष्टात आली. लेखन व शिक्षण सर्व जातीधर्मांना खुले झाले. इथे जाता जाता एक गोष्ट सांगितली पाहिजे, आपल्याकडे ज्ञान हे केवळ अध्यात्माशी निगडित आहे. तत्त्वज्ञानात्मक ज्ञान हेच फक्त ज्ञान

आहे अशी समजूत आहे. ही समजूत ब्राह्मण वर्गाने जोपासली आणि यांत्रिक ज्ञान हे दुय्यम बनले. ब्राह्मणांची जशी अमूर्त ज्ञानावर मक्तेदारी होती तशीच मक्तेदारी लोहारांची लोहार कामावर होती. ब्राह्मणांना लोहारकाम येत नसे तेव्हा उपयुक्त व व्यावसायिक ज्ञानावरही त्या त्या विशिष्ट जमातींची मक्तेदारी होती असे आपणास दिसते. ब्राह्मणांवर हल्ला करताना ही गोष्ट अनेकदा विसरली जाते. ब्राह्मणांनी वर्चस्व गाजविले ते धार्मिक ज्ञानाच्या जोरावर नव्हे तर धार्मिक ज्ञान हे सर्वश्रेष्ठ ज्ञान आहे अशी भूमिका इतरांना पटवून देऊन ! वैश्य जाणिवेने नवीन ज्ञान खुले करताच धार्मिक ज्ञानाची पुनर्मांडणी करावी लागली. धार्मिक आध्यात्मिक साहसवीर निर्माण झाले. त्यांनी धर्माचा नव्याने शोध घेतला. त्यामुळे शब्दप्रामाण्य व धार्मिक चाली वगैरे क्रियांवरचा विश्वास उडाला. त्याने नवीन पुनरुत्थान घडवून आणले.

४) जातिव्यवस्था नष्ट होण्यास प्रारंभ झाला.

५) दळणवळणाची नवी साधने निर्माण होऊन समाज संघटित होऊ लागला.

६) स्मृतींवर आधारित असलेल्या रानटी कायदेव्यवस्था व न्यायव्यवस्थेपासून समाज मुक्त झाला. ब्राह्मणांची सर्वात मोठी शक्ती नष्ट झाली.

७) केशवपन, सती यांसारख्या रानटी चाली बंद पडल्या.

८) अस्पृश्यतेविरुद्ध विचार-जागरण होऊन ती नष्ट होण्यास प्रारंभ झाला.

९) कलांमध्ये अनेक ब्रिटिश प्रकार उसने घेतले गेले. त्यातून कला समृद्ध झाली, वगैरे.

वर केवळ कुणालाही सहज कळतील असे मोजके फायदे सांगितले आहेत. वसाहतवादाने त्या त्या वसाहतीत सर्वंकष परिवर्तन घडवून आणले. अर्थात ह्याची पुरेपूर किंमत इंग्रजांनी वसूल केली.

इंग्रजांनी येथील नैसर्गिक साधनसंपत्ती पुरेपूर वापरली.

त्यांनी इथल्या माणसांना अत्यंत अल्प मजुरी देऊन हवे तसे राबविले.

ह्यामुळे जे देशाचे नुकसान झाले असे आपण म्हणतो ते खरे काय ? पेशवाईच्या काळात जवळ जवळ ८० टक्के जनता इथे अत्यंत भीषण अवस्थेत जगत होती. गुलामांचा वापर पेशवाईतही होता. उलट अस्पृश्य व शूद्रांची अवस्था अत्यंत वाईट होती. इंग्रजांनी पेशवाई नष्ट करून इथल्या बहुजन समाजावर उपकारच केले. इंग्रज आले नसते तर काय झाले असते ? नेमाडेंनी त्यांच्या मीमांसेत हा प्रश्न कधीही उच्चारलेला नाही. मराठी भाषा विकृत झाली म्हणून गहिवरणाऱ्या नेमाडेंना हे दिसत नाही की इतरांना ही भाषा लिहिताच येत नव्हती. इंग्रजांमुळे लोक लिहायला

शिकले हा एकच फायदा इतका मोठा आहे की त्यापुढे भाषेचे इंग्रजी वळण दुय्यम ठरावे.

नेमाडे हे महानुभव गद्य आणि वारकरी काव्य हे फार प्रभावी होते असे म्हणतात; पण ह्यातील तात्त्विक शब्द पाहिले तर ते अनेकदा संस्कृतमधूनच आलेले दिसतात. आईन्स्टाईनचा सापेक्षता सिद्धांत हा महानुभव गद्यात व्यक्त झाला असता असे नेमाडेंना सुचवायचे आहे काय ? नेमाडे यांची भाषेच्या प्रगतीबाबत नेमकी काय समजूत आहे ? मौखिक परंपरा ही आज विसाव्या शतकातील अफाट ज्ञानाचे आणि माहितीचे संवर्धन करू शकली असती काय ? किंबहुना मौखिक परंपरेने हे ज्ञान मिळविण्याची परंपरा इतकी मंदावली असती की आपण अद्याप बैलगाडीतूनच प्रवास करीत बसलो असतो.

मला नेमाडेंच्या भाषाविचारात सर्वांत मोठी गफलत कोणती जाणवत असेल तर ती म्हणजे, त्यांचा भाषाविचार हा प्रचंड साहित्यकेंद्री आहे आणि माझ्या मते साहित्यनिर्मिती हे भाषेचे केवळ एक कार्य आहे. भाषेचे मुख्य कार्य वैज्ञानिक, तंत्रज्ञानात्मक आणि मानव्य शाखात्मक ज्ञानाचे संग्रहण, संवर्धन करणे हेही आहे आणि केवळ लेखी परंपरेतच हे संवर्धन मोठ्या प्रमाणावर होऊ शकते. तेव्हा चित्रे, नेमाडे यांचा मौखिक परंपरेविषयीचा अभिमान हा त्यांच्या बौद्धिक दिवाळखोरीचा आविष्कार आहे. तसेच त्यांचा परंपरेतील भाषासमृद्धी ही फार थोर होती हा गोड गैरसमज आहे. परंपरेतील भाषेत अधिक जिवंतपणा होता हे नेमाडे म्हणतात म्हणून आम्ही खरे मानायचे काय ? आज तुकारामाच्या अभंगांइतकाच चित्रेंचा मुक्तछंद मला संपन्न वाटतो. तेव्हा परंपरेचे जे फाजिल लाड आपण करत आहोत ते आपण थांबविले तर फार बरे होईल.

जर भारतात वसाहतवाद आलाच नसता तर भारताचे काय झाले असते हा विचार केला की पेशवाई नष्ट झाली ते बरेच झाले हे पटते. स्त्रियांना जिवंत जाळणाऱ्या, अस्पृश्यांना साध्या स्पर्शापासून लांब ठेवणाऱ्या ह्या हल्कट, नीच आणि भंपक संस्कृतीची मृत्युघंटा वाजली; अन्यथा ब्रह्म सनातन आहे म्हणून शाश्वतवादाची कास धरणाऱ्या ह्या संस्कृतीने लोकांची आयुष्ये अशीच सडवत ठेवली असती यात शंका नाही. तेव्हा मार्क्सच्या विचारांनी प्रभावित झालेल्या विचारवंतांनी जी वसाहतवाद ही प्रचंड शोषण करणारी यंत्रणा होती अशी भूमिका घेतली आहे ती युरोपियन भूमिका आहे. आपण तिचा आपल्या संदर्भात नीट विचार केला आणि इंग्रज की पेशवे असा प्रश्न विचारला तर वसाहतवादाविषयीचा आपला आकस बराच कमी होईल. १८५७ चे बंड अयशस्वी झाले ह्याबद्दल फुलेंच्याप्रमाणेच आपण आनंदोत्सव साजरा करू.

वसाहतवादाचे सामाजिक व राजकीय संदर्भ वगळून त्याने केलेल्या आर्थिक शोषणाकडे

पाहिले तर हे शोषण प्रचंड होते हे कुणीही मान्य करील; पण शेवटी ह्या जगात ज्ञानाची किंमत असते आणि ती मोजावी लागते. तुमच्याकडे खाणी होत्या. मान्य. पण त्यांचा वापर करण्याची अक्कल तुमच्याकडे अजिबात नव्हती. त्यामुळे तुमच्या दृष्टीने हा दगडी कोळसा, मँगेनिज ह्या गोष्टी असूनही तशा नसल्यासारख्या होत्या. इंग्रजांनी स्वार्थासाठी का होईना पण ह्या गोष्टी कशा वापरायच्या ते तुम्हाला शिकवले. तुमच्या जातिव्यवस्थेचा विचार करता तुमच्या समुद्रपर्यटनाला आलेल्या बंदीचा विचार करता तुमची ग्रामीण समाजव्यवस्था, अर्थव्यवस्था बघता तुम्ही या गोष्टी शिकण्यासाठी युरोपात गेला असता असे वाटत नाही. आजही ज्ञान मिळविण्यासाठी गेलेले आपले लोक भारतात परतत नाहीत. पूर्वी समुद्रातून परदेशात जायला बंदी होती. आता परदेशातून समुद्रातून परतायला जणू बंदी असल्यासारखे आपले लोक फॉरेनमध्ये जाऊन सेटल्ड होतात. ह्या सगळ्यांचा विचार करता युरोपियनांनी आपल्याला जी वैश्य जाणीव दिली तिची किंमत आपण आपल्या आर्थिक शोषणाने दिली. काहीतरी मिळवण्यासाठी त्याची किंमत द्यावी लागते हा जगाचा रोखठोक व्यवहार आहे. ह्या व्यवहाराला मोठे तात्त्विक सिद्धांताचे मुलामे चढवून उगाच ब्रिटिशांनी आमचे शोषण केले म्हणून ऊठसूट गळे काढण्यात काय अर्थ आहे ?

१९४७ पूर्वी आपण ही भूमिका घेतली ती योग्यच होती. पण स्वातंत्र्यानंतर इतक्या वर्षांनी तितक्याच भाबडेपणाने पाहण्यात काय अर्थ आहे ? शेवटी आपल्याकडे काय होते ? आपल्याला काय मिळाले ? आणि आपण ह्यासाठी कोणती किंमत मोजली ह्याचा काही ताळेबंद आपण मांडणार आहोत की नाही ? शेवटी ब्रिटिशांनी बाहेर काढलेल्या कोळशावर आपली रेल्वे पण चाललीच ना ? आपणही वीज वापरलीच ना ? ह्यासाठी अव्वाच्या सव्वा किंमत मोजावी लागली हे खरे; पण युरोपियनांनी, त्यांच्या संस्कृतीने हे सगळे प्राप्त करण्यासाठी एका वेगळ्या स्वरूपात किंमत मोजली नव्हती काय ? आपल्या लोकांना मजूर म्हणून चाबकाचे फटकारे बसले तसे युरोपमधल्या संक्रमण काळात तिथल्या कामगारांना बसले नव्हते काय ? तिथे अनेक संशोधकांना जिवाची किंमत मोजावी लागली. अनेक संशोधकांनी आपली आयुष्ये ज्ञानासाठी अक्षरशः जाळली. तिथल्या शेतमजुरांनाही भांडवलशाहीचा विकास होत असताना बरेच सोसावे लागले. तिथेही कामगार कायदे आकाशातून आपोआप पडले नाहीत. तेथील कामगारांनाही हे सगळे कायदे झगडून पदरात पाडून घ्यावे लागले. आपल्याला काही गोष्टींची किंमत जास्त मोजावी लागली हे जितके खरे आहे, तितकेच हेही खरे आहे की काही गोष्टी आपल्याला कसलीच किंमत न देता मिळाल्या. उदा. न्यूटनचे नियम आपल्याला आयते मिळाले. गणिताचा विकास आयताच हाती पडला.

वसाहतवादाचे विश्लेषण करताना कळत नकळत समाजवादी विचारसरणीच्या आहारी आपण सारे जात असतो, किंबहुना शोषण ही संकल्पना मार्क्सवाद्यांनीच प्रभावीपणे वापरली; पण ही वापरताना त्यांनी नेहमीच व्यक्तिवादी वैश्य जाणीव विरूद्ध समूहवादी (समाजवादी) वैश्य जाणीव असा संघर्ष पाहिला. ह्याच वसाहतवादाने त्या त्या प्रदेशात ब्राह्मण जाणीव विरुद्ध वैश्य जाणीव किंवा वसाहतवादी वैश्य जाणीव विरुद्ध स्वातंत्र्यवादी क्षत्रिय जाणीव हेही दोन संघर्ष उभे केले हे त्यांनी पाहिले नाही.

ह्याची अनेक कारणे होती, एकतर ते समूहवादी वैश्य जाणिवेच्या चष्म्यातून विश्व पहात होते आणि दुसरी गोष्ट युरोपमधल्या तत्त्वज्ञानाला नेहमीच सर्व गोष्टी द्विध्रुवात्मक दिसतात. स्त्री विरुद्ध पुरुष, भांडवलदार विरुद्ध कामगार वगैरे संघर्षमय भूमिकेतच त्यांनी आपल्या तत्त्वज्ञानाची मांडणी केली आहे. ह्या मांडणीने युरोपचे पुरेसे नुकसान केलेले आहे. आपण जग कधीच संघर्षाच्या स्वरूपात पाहिले नाही. चीनचा ताओवाद असो की जपानचा झेन की उपनिषदातला आनंदवाद की बुद्धाचा महावीराचा धम्म असो आपण नेहमीच विश्व समायोजनेच्या स्वरूपात पाहिले. भारतीय बलुतेदार पद्धत ही समायोजनेची पद्धत होती. ती चुकीची होती हे निर्विवाद; पण दिवसेंदिवस आक्रमक आणि बेधुंद होत चाललेल्या पर्यावरणाची नासाडी करत चालणाऱ्या भांडवलदारशाहीला तिच्यातून एक गोष्ट निश्चितपणे शिकता येईल ती म्हणजे समायोजन.

युरोपियनांनी संघर्षावर तर आपण समायोजनावर अतिरिक्त भर दिला. आता ह्या दोघांचा नीट मेळ साधूनच नवी जागतिक अर्थव्यवस्था निर्माण करता येईल. हे करताना भारताला सुरुवातीला मात्र आक्रमक भूमिकाच स्वीकारावी लागेल. सुरुवातीला गावगाड्यांची बलुतेदारी अर्थव्यवस्था आणि नंतर संरक्षण देणारी समाजवादी व्यवस्था ह्या दोन्ही व्यवस्थेत आपण संघर्ष सोयीस्कररित्या टाळला आहे. समाजवादाचा स्वीकार सर्वच राष्ट्रांनी भराभर केला त्याचे एक कारण असेही होते की, त्यातील स्थानिक अर्थव्यवस्थांना स्पर्धा आणि संघर्ष मुळात टाळायचाच होता. हजारो वर्षे त्यांनी ह्याच गोष्टी टाळल्या होत्या. आता मात्र हा संघर्ष समाजवादच कोसळल्यामुळे, त्यांच्या दारी आला आहे. या संघर्षाला तोंड देण्याऐवजी पुन्हा एकदा देशीवादाची हाकारी दिली जाण्याची शक्यता नाकारता येत नाही. कारण तीच आपली मनोवृत्ती आहे.

सिंधुबंदी करणारा हा जगातील एकमेव देश असावा. भारत हा नेहमीच टोकाच्या देशीवादी भूमिकेत जगला आहे. स्वतःचा देश आणि स्वतःची जात सोडून जाणे आमच्या नेहमीच जिवावर येते. दुसऱ्या धर्मातील पोरग्याशी किंवा पोरीशी लग्न करताना आजही आम्हाला धाप लागते. संघर्ष नको असल्यानेच आम्ही भ्रष्ट मार्ग अवलंबतो. भारतीय माणूस हा जगातील सर्वात जास्त

भ्रष्टाचारी माणूस आहे. कारण एखादी गोष्ट प्रामाणिकपणे संघर्ष करून मिळविण्यापेक्षा ती विकृत समायोजन करणाऱ्या भ्रष्ट मार्गाने मिळविण्यावर आमचा जास्त विश्वास असतो.

आज भारतीय परदेशात स्थिर होऊ इच्छितो; कारण इथल्या बुद्धिमान लोकांना इथल्या समस्यांशी संघर्ष करणे टाळायचे असते. तिथे यशाचा शॉर्टकट दिसतो. हे सगळे बदलायचे असेल तर ह्या देशात पुन्हा एकदा जाज्वल्य मनोवृत्तीचे बुद्धिमान लोक तयार व्हायला पाहिजेत नेमाडे हे असेच एक गृहस्थ आहेत. चित्रे हे असेच एक गृहस्थ आहेत. मात्र त्यांच्यावेळी ग्लोबलायझेशन आमच्या पिढीच्या जसे घरातच आले तसे आले नाही. ते त्यांच्या अंगणात नाचत राहिले. समाजवादाच्या खोट्या संरक्षणाखाली त्यांना त्यांचे घर शाबूत ठेवता आले. ह्यामुळेच देशीवादाचे तत्त्वज्ञान ही मंडळी मांडू शकली. शिवाय स्वतः भारतीय असल्याची प्रतिष्ठा वर्तमानात शोधणे त्यांना शक्य नव्हते. चित्र्यांच्या भाषेत सांगायचे झाले तर सर्वत्र सुन्नता होती आणि दिंडीतील सर्वजण बहिरे आणि मुके होते. त्यामुळेच ह्या पिढीने आपली प्रतिष्ठा परंपरेत शोधली.

१८५० ते १९५० या काळात एकही थोर कवी जन्मला नाही. त्यामुळे तुकारामाची पुनर्स्थापना करण्यावाचून पर्याय उरला नाही. जगात मराठीला तोंड दाखविण्यासाठी ह्यांच्याखेरीज होते काय ? केशवसुतांपासून फालतू कवींची एक रांगच रांग तयार झाली होती. शाहीर कुठेच बसत नव्हते. बिचारा तुकाराम शिल्लक राहिला. परंपरेत प्रतिष्ठा शोधण्यासाठी या खटाटोपात परंपरेतील ९० टक्के गोष्टी वाईट होत्या आणि त्या नष्ट करण्यात वसाहतवादाची भूमिका मोठी होती हे सत्य सोयीस्कररित्या विसरले गेले.

वसाहतवादाची ही पार्श्वभूमी लक्षात आली की, आपण नेमाडेंच्या मुद्द्यांकडे जास्त डोळसपणे पाहू.

नेमाडे यांच्या मते *"इंग्रजांनी इंग्रजी शिक्षणातून इंग्रजी मूल्ये लादली"*. मुळातच नेमाडे ज्यांना इंग्रजी मूल्ये म्हणतात ती वैश्य जाणिवेतून आलेली मूल्ये आहेत. ती इंग्रजी किंवा फ्रेंच नाहीत आणि ती त्यांनी भारतावर लादली ते बरेच केले. अन्यथा हा देश ब्राह्मण जाणिवेतच डुंबत राहिला असता. त्यांचा गोरा रंग सुंदर असणे वगैरे मूल्ये केवळ त्यांची नाहीत. ती फ्रेंच, जर्मन आणि अमेरिकन संस्कृतीतही आढळतात आणि ती संस्कृती श्रेष्ठत्वाच्या भावनेतून आली. केवळ इंग्रजांना ह्याबाबत दोष देण्यात अर्थ नाही. दोष दिलाच तर गोऱ्या कातडीच्या सर्वच पाश्चिमात्यांना व एतद्देशीयांना दिला पाहिजे. (विशेषतः आर्यांना) इंग्रज श्रेष्ठ व देशी कनिष्ठ हा त्यांनी केलेला फरक खराच होता. शेवटी जाणिवेच्या विकासाबाबत ते पुढे होते. शेवटी मान मागून मिळत नाही,

तो कर्तृत्वाच्या जोरावर कमवावा लागतो.

नेमाडे यांच्या मते *"आपला वाङ्मयीन परीघ हा बृहत् व बहुस्तरीय तर इंग्रजांचा तो लहान आहे. त्यामुळे इंग्रजांची मूल्ये आपल्या वाङ्मयाला लावून चालणार नाही"*. खरेतर इंग्रजांचा वाङ्मयीन परीघ लक्षात घेतला तर तुलनेसाठी मराठीचा परीघ विचारात घ्यावयास हवा. संपूर्ण भारताशी तुलना करायची झाल्यास ती संपूर्ण युरोपशी करणे अधिक योग्य होईल..ह्या तुलनेत दोन्ही वाङ्मयीन परीघ सशक्त वाटतील.

प्राचीन महाकाव्याच्या संदर्भात आपली महाकाव्ये ही जगात श्रेष्ठ आहेत. आपली प्राचीन कविता ही युरोपपेक्षा उजवी वाटते; पण नाटक, कादंबरी व आधुनिक कविता ह्याबाबतीत युरोप अधिक उजवा आहे. त्याच्याकडे तुकाराम नाही हे जितके खरे आहे तितकेच आपल्याकडे शेक्सपियर नाही हेही खरे. त्यांची वाङ्मयीन मूल्ये लावून आपले वाङ्मय पहायला काहीच हरकत नाही. त्यामुळे आपले स्वत:चे आकलन वाढते. त्यांच्या शैलीविज्ञानाचा वापर खुद्द नेमाडे यांच्या 'साहित्याची भाषा' या ग्रंथात आहेच.

आपण आपल्या वाङ्मयीन मूल्यांच्या साहाय्याने त्यांचे मूल्यमापन केले नाही किंवा आपल्या परंपरेतून आधुनिक वाङ्मयीन मूल्ये विकसित केली नाहीत हा आपला दोष आहे. आपली वाङ्मयीन मूल्ये आपल्या परंपरेतून विकसित करून त्यांनीच त्यांच्या वाङ्मयाचे मूल्यमापन करावे काय ? आपल्या आळशीपणाचे खापर त्यांच्यावर फोडण्यात अर्थ काय ?

नेमाडेंच्या मते *"भारतीयांनी इंग्रजीला पर्याय म्हणून जो संस्कृत प्रभाव स्वीकारला त्याने भाषेतले चैतन्य कमी केले आणि लय बिघडवून टाकली."* मला वाटते, नव्या काळानुरूप नवीन लय निर्माण होत असते आणि सुरुवातीचा कालखंड ह्याबाबत चाचपडत जातो. ज्ञानेश्वरांना मराठीत लिहिताना ज्ञानेश्वरीत संस्कृतचा भरपूर आधार घ्यावा लागलाय. त्यानंतरची मराठी फारसी शब्दांनी व्याप्त आहे. ह्या फारसी शब्दांनी मराठीची लय बिघडली असे नेमाडेंना वाटत नाही; पण संस्कृतने मात्र मराठी बिघडवली असे त्यांना वाटते. नेमाडे हे विधान आकसापोटी करीत आहेत असे वाटते. संस्कृत ही जगातील एक संपन्न भाषा आहे. तिचा केवळ ब्राह्मणांनी वापर केला म्हणून ती खराब आहे असे म्हणणे चुकीचे आहे. संस्कृतने वैचारिक गद्यासाठी आवश्यक ती मदतच केली आहे. तिच्यामुळे मराठी भाषा विज्ञानासाठी अधिक अचूक झाली आहे हे सत्य आहे. त्यामुळे थोडा जोम कमी झाला असेल; पण सुरुवातीला हे कात टाकताना घडतेच हे आपण लक्षात घ्यायला हवे.

दुसरी गोष्ट म्हणजे, साहित्यातील भाषेचा जोर कमी झाला तरी वैज्ञानिक गद्य मराठीत प्रथमच एवढ्या मोठ्या प्रमाणावर विकसित झाले आणि त्यात संस्कृतचा फार मोठा वाटा आहे हे

आपण कबूल केले पाहिजे. केवळ साहित्यातील भाषा हीच खरी भाषा ही गोष्ट नेमाडे कळत नकळत गृहीत धरतात. ते अत्यंत चुकीचे आहे. भाषेचे ज्ञान साठवणे आणि कम्युनिकेट करणे हेही तितकेच किंबहुना जास्तच महत्त्वाचे काम आहे.

*"समाजाच्या विरोधात व्यक्ती ही मुळातच पाश्चिमात्य संकल्पना आहे आणि त्यात व्यक्तित्व हे कमाल मर्यादेपेक्षा ताणले जाते. व्यक्ती आणि समाजातील ह्या तणावात्मक नात्यास हिंदूंचे नीतिशास्त्र व हिंदू समाजरचना मान्यता देत नसल्यामुळेच १९१८ नंतरच्या साहित्यातून अभिव्यक्त झालेला व्यक्ती व समाज यांच्यातील संघर्ष अस्वस्थता निर्माण करण्याऐवजी मनोरंजनच अधिक करतो."* नेमाडे यांच्या विवेचनातील हा एक महत्त्वाचा मुद्दा आहे; कारण कोसलात व्यक्तिवादी असलेले नेमाडे नंतर सामाजिक झाले, त्यामागे हाच मुद्दा आहे आणि त्यांच्या समीक्षेत तो वारंवार येतो. नेमाडे ह्याच मुद्द्याच्या आधारे कादंबरीत सामाजिक द्रव्य असलेच पाहिजे असा आग्रह धरतात. हाच मुद्दा जरा वेगळ्या भाषेत मांडला तर नेमाडे व्यक्ती विरुद्ध देश असा संघर्ष अस्तित्वात असल्याचे नाकारतात. विशेषतः भारतात तरी वस्तुस्थिती अशी आहे असा त्यांचा आग्रह आहे.

वास्तविक पाश्चिमात्य देशातही हा संघर्ष काही अचानक सुरू झालेला नाही. ईडिपस डोळे फोडून घेतो तो राजाने जो सामाजिक न्याय दिला आहे तो प्रस्थापित व्हावा म्हणूनच. अँटीगनी दफनाचा आग्रह धरते कारण तिची धार्मिक रूढींवर श्रद्धा आहे म्हणूनच; तिला काही व्यक्तिगतरित्या तसे वाटत असते म्हणून नव्हे. पाश्चात्य महाकाव्यातील पात्रे तत्कालीन नीतिमत्तेचे समर्थनच करतात. ख्रिश्चॅनिटीचा पुरस्कार नंतर सर्वच कलाकारांनी केलेला दिसतो. समाजाची व चर्चची सर्वंकष पकड तिकडेही दिसते. आपल्याकडे ही पकड अधिक घट्ट दिसते. ह्यामागे हिंदूंची नीतिशास्त्रे व समाजरचना आहे हे उघड आहे; पण ही नीतिशास्त्रे व समाजरचना आम्ही का प्रमाण मानावीत ? अनेक मूर्ख गोष्टींवर आधारित, रानटी असलेली, जातिव्यवस्थेचा पुरस्कार करणारी व ब्राह्मण जाणिवेचे व क्षत्रिय जाणिवेचे वर्चस्व सतत रहावे म्हणून निर्माण झालेली ही नीतिशास्त्रे व सामाजिक रचना फार थोर आहे असे नेमाडेंना सुचवायचे आहे काय ? नेमाडे त्यांच्या विवेचनात हिंदू धर्मातील सहिष्णुतेचा व उदारमतवादाचा पुरस्कार करताना दिसतात. अलीकडे ही टूमच निघालेली आहे. तेव्हा हा मुद्दा जरा खोलात जाऊन पाहिलाच पाहिजे. गांधींना गोळ्या घालणारी, चोखामेळ्याला भिंतीत गाडणारी, दलितांच्या वस्त्या जाळणारी ही सहिष्णुता असल्याने तिचा जरा नीट विचार केला पाहिजे.

एक गोष्ट निश्चित आहे. जातिव्यवस्थेबाबत ही शास्त्रे कधीच सहिष्णु नव्हती.

ज्ञानेश्वरांपासून आंबेडकरांपर्यंत सर्वांनाच तिचे चटके बसले आहेत. नव्वद टक्के जनता त्यात भरडली गेली. ही जातिव्यवस्था मोडली जाणार नाही याची काळजी घेणारी ग्रामीण अर्थव्यवस्था ही कधीच सहिष्णु नव्हती. शूद्रांनी आणि अतिशूद्रांनी कामे केली नाहीत तर त्यांचे काय हाल होत हे सर्वश्रुत आहे. आपल्या स्मृतीतील कायदे किती सहिष्णु आहेत हे सर्वचजण जाणतात. बायकांना हसत हसत सती जाऊ देणारी, तिला दुसऱ्या विवाहाची अनुमती न देणारी आणि शिक्षण तिच्यापासून लांब ठेवणारी अशी ही तथाकथित सहिष्णुता आहे आणि ह्या तथाकथित सहिष्णुतेविरुद्ध बंड होऊ नये म्हणून जातिव्यवस्थेची उतरंड रचून व्यक्तीला संघर्ष करण्याची संधीही न देणारी अशी ही ब्राह्मण जाणिवेतून जन्मलेली सामाजिक रचना आहे. तेव्हा व्यक्ती विरुद्ध समाज हा संघर्ष आपल्या इथे नाही ही अभिमानाची नव्हे तर शरमेची गोष्ट आहे. किंबहुना असा संघर्ष केवळ सहिष्णु समाजातच जन्मतो. भारतीय समाजासारख्या असहिष्णु समाजात तो शक्य नाही.

सर्वसाधारपणे ज्या सहिष्णुतेचा पुरस्कार केला जातो तिचा आधार धार्मिक असतो. ह्या देशात हिंदू धर्माबाबत इथे एखाद्या व्यक्तीची वेदावर व गीतेवर, पुराणावर श्रद्धा नसली तरी ती व्यक्ती हिंदू राहू शकते असे म्हटले जाते व हिंदू धर्माच्या सहिष्णुतेमुळे असे घडते असे सांगितले जाते. प्रत्यक्षात ह्या घडण्यामागे परम असहिष्णुता आहे. जगाच्या पाठीवर असा कुठलाही धर्म नसेल की जिथे त्या धर्माच्या अनुयायांना तो धर्मग्रंथ ऐकल्याबद्दल कानात शिसाचा रस ओतण्याची शिक्षा असेल. स्त्री, शूद्र, अतिशूद्र ह्यांना धर्मग्रंथ वाचण्याची वा काहीवेळा ऐकण्याचीही बंदी (अस्पृश्यांबाबत ती ठामच दिसते) म्हणजे जवळ जवळ ऐंशी ते पंच्याऐंशी टक्के समाजाला धर्मग्रंथांविषयी काही माहिती नाही अशा समाजाला कसली धार्मिक आस्था असणार ? त्यामुळे प्रत्येक गटाने आपापल्यापुरती एक पूजाअर्चा निश्चित केली. परिणामी सर्व समाजाच्या चिरफाळ्या होऊन सर्वांना एकत्र बांधेल असे तत्त्व नाही. धर्मग्रंथ नाही त्यामुळेच भारतात एकेश्वरवाद नीट फोफावत नाही.

अनेक देव असणे ब्राह्मणांना फायदेशीर होते. कारण जेवढे देव अधिक तेवढ्या पूजाअर्चा अधिक, यज्ञ अधिक, शांत्या अधिक आणि साहजिकच दक्षिणा अधिक. ह्याला शह देण्याचा प्रयत्न वैष्णववाद्यांनी केला खरा; पण त्याला यश मिळाले नाही; कारण शेवटी सामाजिक कायदे, नीतिशास्त्रे अखेरपर्यंत ब्राह्मणांकडे तर आध्यात्मिक कल्लोळ भक्ति संप्रदायाकडे अशी विभागणी कायमच राहिली. त्यामुळे भारतातला एकेश्वरवाद कायम दुभंगल्यासारखा राहिला. त्याला इस्लाम किंवा ख्रिश्चन यांच्याप्रमाणे कधीच एकात्मता प्राप्त झाली नाही. ब्राह्मणांनी ती कधीच होऊ

दिली नाही. जातिव्यवस्था व अर्थव्यवस्था ह्यांनी साथच दिली.

एकीकडे एकेश्वरवादाची ही अवस्था तर दुसरीकडे जैन व बुद्ध हे ब्राह्मण जाणिवेविरुद्ध लढणारे, धर्म पूर्ण नास्तिक, निरीश्वरवादी. त्यामुळे त्यांच्याकडून ह्याबाबत काही होणे शक्य नव्हते. रशियन राज्यक्रांतीप्रमाणेच अकाली किंवा काळाच्या आधी झालेली आणि काळाच्या फार पुढे असलेली ही बंडे होती. शिवाय मागेच म्हटल्याप्रमाणे पाऊस का पडतो ह्यासारख्या मूलभूत प्रश्नाचे उत्तर अमूर्त प्रत्यक्ष व समूर्त प्रत्यक्ष ज्ञान यांच्याकडे नसल्याने शेवटी हेही धर्म ब्राह्मण जाणिवेच्या ताब्यात गेले. (अलीकडे नवबौद्धांनी बाबासाहेबांचे फोटो लावून व त्यांच्या शब्दाबाबत शब्दप्रामाण्य बाळगून आपल्यात सुप्त रूपात असलेल्या ब्राह्मण जाणिवेची लक्षणे उघडपणे दाखवायला सुरुवात केली आहे. पूर्वी वेद, पुराणे चुकली म्हणायची सोय नव्हती, आता बाबासाहेब चुकले असे म्हणायची सोय राहिली नाही. वास्तविक बाबासाहेबांचे अर्थकारण पूर्णपणे चुकले आहे तर समाजकारण पूर्णपणे अचूक असल्याचे प्रत्ययास येते आहे. म्हणजे बाबासाहेब निम्मे चुकलेत हे उघडपणे कबूल केले पाहिजे; पण तसे म्हणण्याची छाती आज कोणाचीही होत नाही. उच्चवर्णियांना दलितांना दुखवायचे नाही तर दलितांना बाबासाहेब चुकू शकतात हे पटतच नाही. एकंदर ही नवी ब्राह्मण जाणीव आता चांगलीच तापदायक ठरणार असा रंग दिसतो आहे) ह्या सर्व विवेचनावरून हिंदूंची सहिष्णुता ही किती भंपक गोष्ट आहे हे सहज समजून येईल.

ब्राह्मण आणि क्षत्रिय जाणिवेविरुद्ध लढू शकेल अशी एकमेव जाणीव होती ती म्हणजे वैश्य जाणीव. ह्या जाणिवेने बुद्ध व महावीर यांच्या प्रभावाखाली बंडेही केली. (मात्र ह्या बंडात क्षत्रिय जाणीवही मिसळली होती. तिला ब्राह्मणांच्या वर्चस्वाला शह द्यायचा होता) पण ती अयशस्वी झाली; कारण ह्यासाठी लागणारा ज्ञानाचा व तंत्रज्ञानाचा विकास झाला नव्हता. वैश्यांची ही बंड करण्याची ताकद ओळखून ब्राह्मण जाणिवेने समुद्रपर्यटनाला बंदी केली. भारतातील ब्राह्मण व क्षत्रियांनी क्वचितच समुद्रपर्यटन केले असेल; पण वैश्यांचा व्यापार समुद्रपर्यटनावर अवलंबून होता. त्यामुळे समुद्रपर्यटन त्यांना अटळ होते. (ब्राह्मण व क्षत्रिय जाणिवेत वाढलेल्या विचारवंतांना समुद्रपर्यटनाचे निश्चित विश्लेषण जमलेले नाही.) त्यांची विशेषतः मोठ्या व्यापाऱ्यांची आर्थिक ताकद त्यावरच अवलंबून होती. ब्राह्मणांनी हे अचूक ओळखून समुद्रपर्यटनाला बंदी घातली. (प्रायश्चिताची सोय करून नंतर एका अर्थाने एक वेगळा रिलीजिअस टॅक्स पण गोळा केला.) ही बंदी घातली नसती तर वैश्य परदेशात जाऊन सेटल झाले असते. वैश्यांना हे जमले नाही; कारण ह्या बंदीमुळे आपले कुटुंब नेणे अशक्य बनले, शिवाय तत्कालीन वैश्य हे ब्राह्मण जाणिवेच्या प्रभावाखाली होते. कदाचित त्यातील काहीजण युरोपमध्ये होऊ घातलेली नवी क्रांती घेऊन परत

शकले असते आणि इंग्रजांनी ती वैश्य जाणीव आणण्याआधीच ती इथे आली असती; पण ब्राह्मण जाणिवेचा पगडा प्रचंड होता आणि वैश्यांचे पतन सुरू झाले. हे पतन इतके झाले की शेवटी कलियुगात वैश्य कुठे आहेत अशी विचारण्याची पाळी आली. कारण ब्राह्मणांना कंटाळून बहुतेकांनी व्यवसाय सोडून शेती स्वीकारली होती आणि व्यापार अधिकाधिक अरब, फारसी व नंतर इंग्रजांनी ताब्यात घेतला.

नेमाडे जो व्यक्ती विरुद्ध समाज हा संघर्ष अस्तित्वात नाही असे म्हणतात त्यामागे पार्श्वभूमी अशी होती. कारण हा संघर्ष मूलतः वैश्य जाणिवेतून निर्माण होतो. नेमाडे म्हणतात तसा तो पाश्चात्त्य वगैरे नाही. जगात कुठेही वैश्य जाणीव तंत्रज्ञानासहित आली की व्यक्ती विरुद्ध समाज संघर्ष उभा राहतो. भारतात ही जाणीव येताक्षणीच राजा राममोहन रॉय ते गोपाळराव आगरकर यांच्यापर्यंत ह्या संघर्षाची एक मालिकाच उभी राहिलेली दिसते. दुर्दैवाने समाजात एवढ्या प्रचंड उलथापालथी घडत असताना लेखकांचा वर्ग उदासीन राहिला. केशवसुतांसारखे लोक त्यामुळे क्रांतिकारक झाले. आगरकरांचे निबंधातले विचार पद्यात लिहिणे ही ह्या गृहस्थांची कामगिरी; पण ती देखील नेत्रदीपक वगैरे झाली ह्यामागची कारणे उघड होती. सर्व लेखकवर्ग हा ब्राह्मण होता. त्यांच्या दृष्टीने काही फरक पडत नव्हता. शंकराचार्य जाऊन मिल्ल, बेथॅम आले. सरकारी नोकरीच्या रूपाने राजदरबाराचा आश्रय आला. दक्षिणा म्हणून वेतन आले. शिवाय मायबाप सरकारची धर्म पाळण्याबाबत कसलीच हरकत नव्हती. मग कसले परिवर्तन आणि काय ? वैश्य जाणीव ही ज्या बहुजन समाजासाठी कार्यरत होती तो होता अडाणी आणि पिढ्यान्‌पिढ्या शिक्षणाबाबत वंचित (तरीही फुले वगैरेंनी चुणूक दाखवलीच. फुल्यांची भाषा जिवंत व रसरशीत वाटते त्याचे कारण ते ब्राह्मण नव्हते हेच आहे.)

हे परिवर्तन टिपू शकेल असा लेखक फक्त बहुजन समाजातच निर्माण होणे शक्य होते आणि नेमका हाच समाज शिक्षण, साहित्य ह्याबाबत इथल्या जातिव्यवस्थेमुळे पन्नास फूट दूर होता. तरीही तमाशात ह्या वर्गाने आपली चुणूक दाखविलीच. त्याचे आविष्काराचे इतर फॉर्म्स जे त्याच्या हाती होते ते त्याने वापरले. पण ह्या कला क्षणजीवी असल्याने त्या त्यांच्याबरोबर नाहिशा झाल्या. तत्कालीन खरे मराठी साहित्य हे सत्यशोधकीय जलशात अस्तित्वात होते ते जवळ जवळ निसटून गेले. ह्या काळातले वैश्य कदाचित साहित्यात हे सर्व पकडू शकले असते; पण पहिल्यापासूनच हा वर्गही साहित्यापासून पन्नास फूट दूर. शिवाय फुल्यांनी संभावना केल्याप्रमाणे शेटजी बनलेल्या ह्या वर्गाला वैश्य जाणीव म्हणजे पर्वणी होती. भांडवलदाराने करावयाचे उत्पादक काम न करताच ह्याला वैश्य जाणिवेचे फायदे मिळाले आणि हा वर्ग निखळ वाणीच राहिला.

पूर्वीचा ब्राह्मण अथवा क्षत्रिय वर्ग जेवढा नैतिकदृष्ट्या दिवाळखोर होता तितकाच हाही वर्ग बनला. त्याला साहित्य लिहिण्यापेक्षा पैसे ओढण्यात जास्त रस होता. त्यामुळेच मराठी साहित्यात १८१८ नंतर जी निर्मिती झाली तिच्यात एवढ्या मोठ्या उलथापालथीचे कसलेही प्रतिबिंब पडले नाही. (आज ब्राह्मणांनी धंद्यात पडणे किंवा मोठ्या कंपन्यांतून काम करणे सुरू करताच धंद्यातल्या अनेक बाबींबर साहित्य निर्माण होणे सुरू झाले आहे. ह्यामागचे कारण वरील पार्श्वभूमीवरून सहज कळेल.) थोडक्यात, प्राचीनकाळी व्यक्ती विरुद्ध समाज हा संघर्ष निर्माण होण्यासाठी पूरक परिस्थिती नव्हती. त्यामागे विशिष्ट हितसंबंध होते व त्यामुळेच तत्कालीन साहित्यात त्याचे प्रतिबिंब पडले नाही.

हा संघर्ष आधुनिक काळात निर्माण झाला आणि त्याचे प्रतिबिंब आता साहित्यात पडते आहे. १९ व्या शतकातील ब्राह्मणवर्गाला 'मुक्तामाला' सारख्या कादंबऱ्या अधिक लिहाव्याशा वाटल्या. कारण वैश्य जाणिवेतून निर्माण झालेला फावला वेळ करमणूक करण्यात घालवणे त्यांना आवश्यक वाटले आणि त्यासाठी मुक्तामालासारख्या कादंबऱ्याचे वाचन, शांकुतलसारखी नाटके, बालगंधर्वांची संगीत नाटके हे त्यांच्या जीवनाचे भाग बनले. वैश्य जाणिवेतून ज्या गोष्टी निर्माण झाल्या त्यातील एक म्हणजे पॉप्युलर लिटरेचर. जगभर आजही हे साहित्य निर्माण होते आहे, आवडीने वाचले जाते आहे. मंजुमाला ही प्रवृत्ती जगभरच आहे; कारण लोकांना करमणुकीसाठी ती आवश्यक वाटते. नेमाडेंनी हे वाङ्मय गंभीरपणे घेऊ नये हे उत्तम. कारण पांडवप्रताप, आख्याने, तमाशा ही साधने पूर्वी अस्तित्वात होती त्याऐवजी मंजुमाला अस्तित्वात आली.

नेमाडेंनी आंग्ल मराठी संपर्क या निबंधात (पान २६१) वर म्हटलंय की "*पाश्चिमात्य आदर्शांना सहाय्यक अशी मराठी नाटकांची भिस्त इंग्रजी नाट्यपरंपरेवर उभारलेल्या तीन युनिट्या किंवा आणि कथानकाची पाच अंकात व निरर्थक दृश्यांमध्ये विभागणी करण्यावरच होती. मात्र आपल्या पारंपरिक लोकनाट्यामध्ये अतिशय सर्जनशील पद्धतीने केलेल्या अवकाशाच्या व काळाच्या वापराची जाणीव आपल्या नाटकांना अलीकडेच झालेली आहे.*" नेमाडेंचा लोकपरंपरेतील तंत्राचा गौरव गेली अनेक वर्षे चाललाय. देशी नाटक देशी तंत्रातून निर्माण होते असा त्यांचा युक्तिवाद असावा.

नेमाडेंची ही अपेक्षा हिंदू नवरदेवासारखी आहे. आमच्या हिंदू नवरदेवांना बायको आधुनिक हवी असते; पण तिने मंगळसूत्र घालावे अशी अपेक्षा असते. तिने सेक्सवरची इंग्रजी व मराठी पुस्तकेही वाचली पाहिजेत, त्याचबरोबर स्वतःखेरीज इतरांबरोबर झोपू नये अशीही अपेक्षा असते. नेमाडेंना बायको सेक्स एज्युकेशन झालेली हवी आहे. पण तिने युरोपियन गोऱ्या माणसाबरोबर

झोपू नये असा त्यांचा आग्रह आहे.

खुद्द नेमाडेंचे लिखाण हे पातिव्रत्य पाळत नाही. ते युरेपियनांचा मुक्तछंद वापरतात तसेच वास्तववादी चित्रणशैलीही वापरतात. नाटकाने मात्र हीच वास्तववादी शैली वापरली तर नेमाडे म्हणणार इथे स्थळ- काळाचे ऐक्य आहे. वस्तुस्थिती अशी आहे की, तंत्र हे तुम्हाला काय सांगायचे आहे ह्यावर अवलंबून आहे. तंत्र ही आशयामागून येणारी गोष्ट आहे. मराठी नाटककारांना सांगण्यासाठी फार काही जवळ नव्हते त्यामुळेच त्यांना युरेपियन तंत्रे नीट वापरता आली नाहीत. अलीकडे एलकुंचवारांनी ही तंत्रे प्रभावीपणे वापरून दाखविली. 'वाडा चिरेबंदी' हे वास्तववादी तंत्राचा उत्तम आविष्कार आहे. लोकनाट्य हे पारंपरिक तंत्र उत्तम आहे. 'घाशीराम कोतवाल'मध्ये तेंडुलकरांनी ते वापरून दाखवले. पण आधुनिक आशय त्यातून व्यक्त झाला का ? नाचगाण्यातच त्यातील आशय वाहून गेला. तंत्राच्या पातळीवर यशस्वी आणि आशयाच्या पातळीवर फसलेले असे ते नाटक आहे. एक विशिष्ट प्रकारचा आशय व्यक्त करायला लोकनाट्य उत्तम आहे, पण आधुनिक जीवनातील व्यामिश्रता व्यक्त करायला ते उपयुक्त ठरत नाही. विशेषतः मानवी स्वभावातील आणि संबंधातील गुंतागुंत व्यक्त करण्यात ते अयशस्वी होते.

माझ्या मते लोकनाट्य ही एक कलात्मक बातमी असते; पण आयुष्य वर्तमानपत्रात व्यक्त होण्याइतके साधे सरळ राहिलेले नाही. हीच गोष्ट अभंग किंवा लोकगीते ह्यांच्याबाबत. आधुनिक आशय ह्यातून व्यक्त करायला गेला की कला भुईसपाट होते हे खुद्द नेमाडे यांच्या मेलडीनंतरच्या कवितांनी सिद्ध केले आहे. आज जगभरचे सर्वश्रेष्ठ कवी आपला आशय (नेमाडेंच्या दृष्टिकोनातून तो देशी आशय) मुक्तछंदातच व्यक्त करीत आहेत. आधुनिक आशय पारंपरिक तंत्रातून व्यक्त करा म्हणणे म्हणजे बैलगाडीची चाके लाऊन विमाने धावपट्ट्यावरून उडवा म्हणण्यासारखे आहे. भारतीय लेखकांनी तरी बैलगाडीच्या नादाला लागून बैलोबा व्हायची काहीच गरज नाही. जेव्हा बैलच न्यायचे असतील तेव्हा मात्र जरूर बैलगाडीची चाके वापरावीत. ह्या देशात अद्याप बैल आहेत तोपर्यंत लोकशैली टिकेल. मात्र ती नष्ट होत चाललेली गोष्ट आहे हे मात्र सांगावेसे वाटते.

नेमाडेंच्या 'आंग्ल मराठी संपर्क ' ह्या निबंधाचा सविस्तर विचार करण्याचे एकमेव कारण म्हणजे त्यांची देशीयतेची संकल्पना त्यांच्या आंग्ल मराठी संपर्काकडे पाहण्याच्या दृष्टिकोनावरच अवलंबून आहे. हा दृष्टिकोनच मुळात किती चुकीचा आहे हे आपण पाहिले. आता आपण त्यांच्या देशीयतेकडे वळायला हरकत नाही.

